**शासकीय कर्मचा-यांच्या वैद्यकीय खर्चाच्या प्रतिपुर्तीच्या मंजुरीबाबत.....**
**प्रतिपुर्तीच्या अनुज्ञेयतेची कमाल मर्यादा व मंजूरीच्या अधिकारांत सुधारणा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः वैखप्र-२०१५/प्र.क्र.८२/२०१५/राकावि-२,**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, संकूल इमारत,१० मजला,
मंत्रालय, मुंबई - ४०० ००१,
**दिनांक :- २४ ऑगस्ट, २०१५.**

वाचा :-

**१) शासन निर्णय,सार्वजनिक आरोग्य विभाग,क्रमांक-एमएजी-२००५/९/प्र.क्र.१/आरोग्य-३, दिनांक-१९ मार्च,२००५,**

**२) शासन निर्णय,सार्वजनिक आरोग्य विभाग,क्रमांक-वैखप्र-२०११/प्र.क्र.३३३/११/ राकावि-२, दिनांक-१६ नोव्हेंबर,२०११.**

**प्रस्तावना :-** शासकीय कर्मचारी व त्यांच्या कुटूंबियांना महाराष्ट्र राज्य सेवा (वैद्यकीय देखभाल),नियम,१९६१ मधील तरतुदींच्या अधीन राहून, आकस्मिक उदभवणा-या २७ आजारांवर खाजगी रुग्णालयात घेतलेल्या उपचारांवरील तसेच ५ गंभीर आजारांवर, शासनाने संपूर्ण खर्चाच्या प्रतिपुर्तीसाठी मान्यता दिलेल्या खाजगी रुग्णालयात घेतलेल्या उपचारावरील, वैद्यकीय खर्चाच्या प्रत्येक प्रकरणी रुपये-१,००,०००/- च्या कमाल मर्यादेत,प्रतिपूर्तीस मंजुरी देण्याचे अधिकार उपरोक्त दिनांक-१६/११/२०११ च्या शासन निर्णयानुसार विभाग प्रमुखांना आहेत. या मर्यादेबाहेरील वैद्यकीय खर्चाच्या प्रतिपुर्तीची प्रकरणे संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागाकडे सादर केली जातात. वैद्यकीय खर्चाच्या प्रतिपुर्तीच्या प्रकरणांना मंजुरी देण्याच्या काही विभाग प्रमुखांच्या वित्तीय अधिकारांत वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

१.महाराष्ट्र राज्य सेवा (वैद्यकीय देखभाल) नियम,१९६१ व त्यानंतर वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयामधील तरतुदींच्या अधीन राहून वित्तीय अधिकारांत खालीलप्रमाणे बदल करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

| अधिकारी | पूर्वीचे अधिकार | सुधारीत अधिकार |
|---|---|---|
| जिल्हाधिकारी | रुपये-१,००,०००/- पर्यन्त | रुपये-२,००,०००/- पर्यन्त |
| मुख्य कार्यकारी अधिकारी | रुपये-१,००,०००/- पर्यन्त | रुपये-२,००,०००/- पर्यन्त |
| विभागीय आयुक्त | रुपये-१,००,०००/- पर्यन्त | रुपये-३,००,०००/- पर्यन्त |

२. रुपये-३,००,०००/- वरील वैद्यकीय खर्चाच्या प्रतिपुर्तीच्या प्रकरणांना महाराष्ट्र राज्य सेवा (वैद्यकीय देखभाल) नियम,१९६१ व त्यानंतर वेळोवेळी निर्गमित करण्यात आलेल्या शासन निर्णयामधील तरतुदींच्या अधीन राहून मंजुरी देण्याचे अथवा उचित निर्णय घेण्याचे पूर्ण अधिकार पूर्वी प्रमाणेच संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभाग प्रमुखांना राहतील.

३. वर नमूद केल्याप्रमाणे विभागप्रमुख व प्रशासकीय विभागप्रमुख स्तरावर प्रकरणांना मंजुरी देताना महाराष्ट्र राज्य सेवा (वैद्यकीय देखभाल) नियम,१९६१ व त्यानंतर वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयामधील तरतुदी काटेकोरपणे तपासून मंजुरी देण्यात यावी.

४. हा शासन निर्णय या निर्णयाच्या दिनांकाला प्रलंबित प्रकरणांना ही लागू राहील.

५. ग्रामविकास व जलसंधारण विभाग तथा महसूल व वन विभागाने हा शासन निर्णय त्यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व कार्यासने व कार्यालये यांना कळविण्याची व्यवस्था करावी.

६. हे आदेश वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक-५८/सेवा-५, दिनांक-१६/०४/२०१५ नुसार निर्गमित करण्यांत येत आहेत.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून संकेताक **२०१५०८२४१३०६४५४४१७** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Vijay Sadashiv Brahmane

Digitally signed by Vijay Sadashiv Brahmane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vijay Sadashiv Brahmane
Date: 2015.08.24 17:38:36 +05'30'

**( वि.स.ब्राह्मणे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य,मंत्रालय,मुंबई,
२. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, (सर्व मंत्रालयीन विभाग),मंत्रालय,मुंबई,
३. मा.राज्यपाल,महाराष्ट्र राज्य यांचे सचिव,राजभवन,मुंबई. (दोन प्रती),
४. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव/सचिव,मुख्यमंत्री सचिवालय,मंत्रालय,मुंबई,
५. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई,
६. सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,मंत्रालय,मुंबई,
७. मंत्री (आरोग्य) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई,

८. राज्यमंत्री (आरोग्य) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई,
९. सचिव,महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई (५ प्रती), (पत्राने)
१०.सचिव,महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय,विधान भवन,मुंबई (१० प्रती), (पत्राने)
११.सेटलमेंट कमिशनर ॲण्ड डायरेक्टर ऑफ लँड रेकॉर्डस,पुणे (२ प्रती),
१२.विभागीय आयुक्त (सर्व) (प्रत्येकी २ प्रती),
१३.जिल्हाधिकारी (सर्व जिल्हे) (प्रत्येकी २ प्रती),
१४.मुख्य कार्यकारी अधिकारी,सर्व जिल्हा परिषद, (२ प्रती),
१५.महालेखापाल,महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा व परीक्षा),मुंबई. (२ प्रती),
१६.महालेखापाल,महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा व परीक्षा),नागपूर. (२ प्रती),
१७.अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई (१० प्रती),
१८.सहसंचालक,अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई (१० प्रती),
१९.चीफ ऑडिटर लोकल फंडस अकाऊंटस,मुंबई (१० प्रती),
२०.सर्व कोषागार अधिकारी,(प्रत्येकी ५ प्रती),
२१.संचालक,आरोग्य सेवा,मुंबई (५० प्रती),
२२.संचालक,वैद्यकीय शिक्षण व संशोधन,मुंबई (५० प्रती),
२३. संचालक,आयुर्वेद, मुंबई (२५ प्रती)
२४. संचालक,राज्य कामगार विमा योजना,मुंबई (२५ प्रती),
२५.व्यवस्थापकीय संचालक,हाफकीन बायो-फार्मास्युटिकल कॉर्पोरेशन,परेल,मुंबई(२प्रती)
२६. महासंचालक,माहिती व जनसंपर्क,मंत्रालय,मुंबई (५ प्रती),
२७. सहसंचालक,आरोग्य सेवा (सर्व),
२८. अधिष्ठाता,शासकीय वैद्यकीय महाविद्यालय (सर्व),
२९. जिल्हा आरोग्य अधिकारी,जिल्हा परिषद (सर्व),
३०. जिल्हा शल्यचिकित्सक,जिल्हा रुग्णालय (सर्व),
३१. प्रबंधक,मुंबई उच्च न्यायालय,मुंबई,
३२. प्रोथोनोटरी व सिनियर मास्टर,मुंबई उच्च न्यायालय,मुंबई (५ प्रती),
३३. वित्त विभाग (कार्यासन सेवा-५),मंत्रालय,मुंबई,(१० प्रती),
३४. व्यवस्थापक,शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय,मुंबई, (२ प्रती),
३५. सर्व मंत्रालयीन विभाग (आस्थापना कार्यासन),मंत्रालय,मुंबई,
३६.निवड नस्ती (राकावि-२),सार्वजनिक आरोग्य विभाग,मंत्रालय,मुंबई.